अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे या समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये नवनिर्मित "पालघर" जिल्ह्याचा समावेश करण्याबाबत-

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः **एसटीसी**-२०१४/**प्र.क्र**.२६०/**का**.१०

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: **१९** सप्टेंबर, **२०१४**

वाचा -

१) **अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र.प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७/०६/२०१४.**

२) **सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे यांचे पत्र क्र.जप्रतस/ऑनलाईन सॉफ्टवेअर/२०१४/५१७४, दिनांक १७.०९.२०१४.**

प्रस्तावना -

महसूल व वन विभाग, क्र.प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७/०६/२०१४ च्या अधिसूचना अन्वये ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन दिनांक ०१.०८.२०१४ पासून पालघर, वसई, डहाणु, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन नवनिर्मित पालघर जिल्हा निर्माण करण्यात आलेला आहे.

आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील सर्व अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्यांचे कामकाज हे ऑनलाईनद्वार सुरु झाले असून अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणीकरिता अर्जदारांना ऑनलाईनद्वारे अर्ज करण्याची सुविधा दिनांक १५.४.२०१४ पासून सुरु झालेली आहे. तथापि, नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या नावाचा उल्लेख समितीच्या कार्यक्षेत्रात तसेच ऑनलाईन सॉफ्टवेअर मध्ये नाही. त्यामुळे अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीच्या कामकाजामध्ये प्रशासकीय तसेच तांत्रिक अडचण उद्भवण्याची शक्यता निर्माण होऊ नये याकरिता नवनिर्मित पालघर जिल्ह्याचा समावेश अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीच्या कार्यक्षेत्रात करण्याबाबतचा आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखाली एकूण ८ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी कार्यरत असून त्यांचे कार्यक्षेत्र हे यापूर्वीच विहित केलेले आहे. त्यानुसार अनुसूचित जमाती प्रमाणपत्र

तपासणी समिती, ठाणे या समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये मुंबई शहर, मुंबई उपनगर,ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग या जिल्ह्यांचा समोवश आहे. तथापि, महसूल व वन विभागाच्या दिनांक १७.६.२०१४ च्या अधिसूचनेन्वये ठाणे जिल्ह्याचे विभाजन होऊन दिनांक ०१.०८.२०१४ पासून पालघर हा नविन जिल्हा निर्माण झालेला आहे. त्यामुळे नवनिर्मित “पालघर” जिल्ह्याचा समावेश “अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे” या समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये करण्यात येत आहे. त्यानुसार ठाणे येथील अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीचे कार्यक्षेत्र पुढील प्रमाणे राहील :-

| अ.क्र. | समिती | जिल्हा |
|---|---|---|
| १ | **अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे** | **मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग** |

२. अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे यांच्याकडे सदरचा शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी प्राप्त झालेल्या प्रकरणांच्या नोंदींमध्ये त्या त्या जिल्ह्यानुसार आवश्यक तो बदल करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२०१२००२५२८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DESHPANDE CHANDRASHEKHAR J

Digitally signed by DESHPANDE CHANDRASHEKHAR J
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DESHPANDE CHANDRASHEKHAR J
Date: 2014.09.20 11:55:35 +05'30'

**( चं.ज. देशपांडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव.
मुख्यमंत्री यांचे सचिव.
उपमुख्यमंत्री यांचे सचिव.

मंत्री/राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
सर्व विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
अतिरिक्त मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

- प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
- प्रबंधक उच्च न्यायालय, मुंबई.
- प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई.
- प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
- प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालयाचे खंडपीठ, औरंगाबाद/नागपूर.
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद.
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ, नागपूर.
- सचिव, गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.

सर्व मंत्रालयीन विभाग.

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना याबाबतच्या सूचना द्याव्यात.

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, २८, क्वीन्स गार्डन, पुणे.
संचालक, समाज कल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, नगर पालिका प्रशासन, मुंबई.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उच्च शिक्षणसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

कुल सचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई/पुणे विद्यापीठ, पुणे/नागपूर विद्यापीठ, नागपूर/अमरावती विद्यापीठ, अमरावती/डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद/शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर/ श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई/उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव.

- आयुक्त, अनुसूचित जाती/जमाती, भारत सरकार, ५ वा माळा, लोकनायक भवन, नवी दिल्ली - ११० ००३.
- उपसंचालक, अनुसूचित जाती/ जमाती आयोग, भारत सरकार, चिपळूणकर भवन, शास्त्री मार्ग, नवी पेठ, पुणे.
- सचिव, कल्याण्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
- मुख्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
- मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई.

अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
सर्व उप आयुक्त, राज्य निवडणूक आयोग.
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती.
ठाणे/पुणे/नाशिक/नागपूर/नंदुरबार/अमरावती/औरंगाबाद/गडचिरोली.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद .
सर्व उपजिल्हाधिकारी.
सर्व उपविभागीय अधिकारी (महसूल).
सर्व तहसिलदार.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
मुंबई/पुणे/कोल्हापूर/नागपूर/अमरावती/नाशिक/औंरगाबाद.
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी/शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई/ शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, का.१०.

- ( पत्राने)